# काम एक : रीती अनेक

वीरेन्द्र मेंहदीरत्ता

अनुवाद
सुषमा सोनक

ISBN 978-81-237-3904-5




₹ 18.00

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

*नवसाक्षर साहित्यमाला*

# काम एक : रीती अनेक

वीरेन्द्र मेंहदीरत्ता

अनुवाद
सुषमा सोनक

चित्रे
सुजाता सेठ




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

ह्याचे मूळ हिंदी पुस्तक जिल्हा साक्षरता समिती, सोलन, हिमाचल प्रदेश आणि नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया ह्यांनी मिळून आयोजित केलेल्या कार्यशाळेत तयार केले गेले.

ISBN 978-81-237-3904-5

प्रथम प्रकाशन : 2002 *(शके 1924)*
पहिली आवृत्ती : 2009 *(शके 1931)*
दुसरी आवृत्ती : 2012 *(शके 1934)*
तिसरी आवृत्ती : 2013 *(शके 1934)*

Kam Ek : Tarike Teen *(Marathi)*

**₹ 18.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया, फेज-II
वसंत कुंज, नवी दिल्ली-110 070 यांनी प्रकाशित केले.

हे माझे घर.
या घराला दोन मजले आहेत
माझी खोली माडीवर आहे.
खोलीला एक खिडकी आहे.
खिडकी लावून घेतली
की काळोख होतो.
जीव घुसमटतो.
खिडकी उघडून तर पहा,
उजेड येतो.
मला उघडी खिडकी आवडते.

खिडकीतून शेते दिसतात.
खिडकीतून आकाश नजरेस येतं,
डावीकडे घरे आहेत.
उजवीकडे घरे आहेत.

समोर मोकळा माळ आहे.
या माळावर काय उभे होईल?

एके दिवशी सकाळी मी उठलो.
खिडकीबाहेर पाहिले.
बाहेर दगडांचा ढीग लागला होता.
दुपारी तिथे मजूर आले.
काही मजूर पाया खणू लागले.



काही मजूर विटा तोडू लागले.
काही मजूर दगड फोडू लागले.

मनात आले, जाऊन विचारावे
इथे कांय बनणार आहे?
बंगला? घर? की अजून काही?
एका मजुरापाशी थांबलो.
तो असा बसला होता
जसा तटकन आता उठून उभा होईल.
त्याचे कोरडे केस सैरभैर झाले होते.
दाढी वाढलेली होती.
कोपरी मळलेली होती.
एकेक वीट अशी तोडत होता
जणू घण घण घाव घालतोय.

संतापाने चडफडत
तो हातोडा उचलत होता अन् शिवीगाळ करत
विटांवर आदळत होता.
रोडा बनवत होता.
विटांचे लहानमोठे कपचे

इकडे तिकडे उडत होते
याची त्याला फिकीर नव्हती.

मी जवळ गेलो. विचारले—
''काय करतो आहेस?''
त्याचे डोळे धगधगत होते.
तो बोलला :
''नशिबातच दगडविटा असतील
तो माणूस अजून काय करेल?



आज विटा कुटतोय
उद्या दगड फोडेन.''

मी विचारले—
''या दगडविटांचं काय करणार?''
तो बोलला—
''काही का होईना.
मला आपली रोजी हवी.
दोन वेळची भाकरी गावली
खूप झालं.''

ते ऐकून
मी पुढे निघालो.
इथे काय बनणार आहे
ते मी कळून घेऊ बघत होतो.

थोडे पुढे गेलो. पाहिले—
अजून एक मजूर
अगदी मजेत पालथी घालून
दगडांच्या ढिगावर बसला होता.

तो देखील दगड फोडत होता.
अगदी लक्ष लावून, हात वाचवून
मनापासून तो दगडांवर हातोडा चालवत होता.
दगड मोठे असले
की तो जोर वाढवे.
दगड छोटे असले की
तोच हात हलका होई.

मी चुपचाप उभा राहिलो. बघत होतो—
तो कामात गुंग होता.
मी जवळ उभा होतो, याचीही त्याला दखल नव्हती.

मला कळेना
कसे त्याला हाकारावे आणि विचारावे—
'इथे काय होणार आहे?'
मी जवळ गेलो. म्हणालो—
"ऐका दादा ऐका."
त्याने वर पाहिले
पण हातचा हातोडा चालू राहिला.
ठक ठक आवाज येत राहिला.



तो बोलला—"काय काम हाय लवकर सांगा.
लई कामाचा ढीग पडलाय.
घडीभराची उसंत नाय."
मी विचारले—"इथे काय बांधणार आहेत?
एखादा बंगला की घर?"

तो बोलला—
"मला काय घेणं देणं?



बंगला असो की घर
मला आपली मजुरी हवी.
ही कमाई करून पाचजणांची पोटं भरायचीत.
हा सगळा ढीग सांजवर फोडायचाय.
खडी मापून पैसे घेईन.
जेवढं काम करेन तेवढीच अधिक कमाई भरेल.
माझा तर पैशाशी मतलब हाये.
भलेही काही का बनेना.
मला काय घेणंदेणं?''
तो हातोडा अजूनही चालू आहे.
ठक ठक आवाज कानावर येतो आहे.

चारच पावले पुढे गेलो असेन
जवळून गाण्याचा सूर आला. मी तिकडे वळलो.
ते गाणे ऐकू लागलो.
बोल कानावर येत होते—
''मन शुद्ध तुझं, गोष्ट हाये
पृथ्वी मोलाची, तू चाल पुढे
तुला रे गड्या भीती कशाची,
पर्वा बी कुणाची?''



तिथून पुढे गेलो.
अजून एक मजूर दगड फोडतांना दिसला.
तो असा थीरथावर बसला होता
जसा एखादा साधू तप करत असावा.
सडकेकडे पाठ केली होती
चेहेरा खाली जमिनीकडे झुकला होता.
तो नादातच गात होता.
साथीला हातोडाही चालत होता.
मी तिथे जवळ जाऊन थांबलो.
गाणे ऐकू लागलो.
जवळ कुणी उभे आहे
हे त्याला कळलेही नाही.

मी विचार करू लागलो—
'याचे गाणे थांबवून
बोलणे सुरू करावे का?
नाही, नाही.'
त्याला पाहून
मला भजन करणारे वारकरी आठवले.
ते भजनात इतके दंग होतात की

सारे देहभान हरपून जाते.
हा मजूर कामात किती गढला आहे!
मला वाटले जणू पूजेतच रमला आहे.
हा कुणाची पूजा करतोय?
पुढे तर नुसती जमीन आहे.
ना देऊळ आहे ना मशीद
ना खुरीस आहे, ना गुरुद्वारा.

मला वाटले
इथे काय होणार आहे ते
याला जरूर ठाऊक असेल.
गाता गाता त्याने विसावा घेतला,
तसे मी चटकन विचारले–
"इथे बंगला बनणार आहे की घर?"
माझे बोलणे ऐकून त्याने हातोडा ठेवला
आणि वळून पाहिले.
हात जोडून, मान लववून
तो मिठास वाणीने बोलला–
"ठाऊक नाय का?
इथं भारी काम निघालंय.



खूप मोठी शाळा होणार बघा.
ज्ञानाचं राऊळ अन् विद्येचं देऊळ.

"शिक्षणाची थोरवी काय सांगावी दादा?
बाळपणापासूनच ही मुलं शिकू लागतील.
चांगले दिवस भेटतील, मंगल होईल.



"शाळा हेच देऊळ, नाही का?
आपलं काम हीच पूजा, खरं ना."

मी मनोमन विचार करीत होतो
तिघेही मजूर एकच काम करीत आहेत.
दगड फोडीत आहेत.
तिघांचेही विचार वेगवेगळे आहेत.
तिघांचीही सरणी वेगवेगळी आहे.
एकाला कामाचं ओझं होतंय.
तो नशिबाला बोल लावतोय.
तो दुःखी आहे.

अन् दुसरा–
दाम करी काम!
अधिकाधिक पैसा मिळवणं
बस, हेच खरं.

तिसरा पण तेच काम करतोय.
तो पण दगड फोडतोय.
तो नशिबाला कोसत नाहीय.



कुटुंबाचं पोषण तोही करतोय.
पण तो एवढे जाणतोय
की शाळेमुळे गाव सुधारेल.
म्हणून तर त्याला कामातच देव भेटलाय.

विचार करत करत
मी घरी परतलो.
खिडकी उघडी होती.
खिडकीतून उन्हे येत होती.
खोली उजळून निघाली होती.